**राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत...... २२१५ २०७१**

महाराष्ट्र शासन

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** राग्रापे-२०१६/प्र.क्र.६१/पा.पु.१०

जी.टी.हॉस्पीटल इमारत, ७ वा मजला,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१

तारीख: - २० मार्च, २०१७

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्याच्या ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत (भारत निर्माण कार्यक्रम) यासाठी अनुदाने, याखाली आर्थिक वर्ष २०१६-१७ मध्ये मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

यासंदर्भात उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत ग्रामीण भागातील नळ पाणी पुरवठा योजना राबविण्यासाठी रु. २५.१८७२६११ कोटी (रुपये पंचवीस कोटी अठरा लक्ष बाहत्तर हजार सहाशे अकरा मात्र) इतके अनुदान सोबतच्या विवरणपत्रानुसार दर्शविल्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना अर्थसंकल्प प्रणालीद्वारे (BEAMS) पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**अटी :-**

१. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी हे अनुदान राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत कव्हरेज व गुणवत्ताबाधीत तसेच देखभाल व दुरूस्तीच्या सर्वसाधारण घटकाच्या निश्चित वार्षिक कृती आराखडयात उपरोक्त घटकांसाठी समाविष्ट असलेल्या प्राथम्यक्रमानुसार येणाऱ्या तसेच ज्या केंद्रीय सहाय्यित योजनांमध्ये शासन सहभाग सक्तीचा करण्यात आलेला आहे अशा , भौतिक दृष्ट्या पूर्णत्वाकडे आलेल्या गावे/वाड्यांमधील योजनांची कामे पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे. तसेच सदर अनुदान भौतिक दृष्ट्या पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण गावे/वाड्या फ्लोराईड/आर्सेनिक, संसद आदर्श ग्राम, हागणदारीमुक्त गावे/वाड्यातील योजना पूर्ण करण्यासाठी प्राथम्याने खर्च करण्यात यावे.

२. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व NRDWP या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र- १ /२, मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांना लेखा परीक्षणाकरिता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे

पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

३. शासन परिपत्रक ग्रामविकास विभाग क्र. आरसीएन-१८९/सी.आर.-३०२७/२८, दि. ५/९/९० मधील सूचनेप्रमाणे सदर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी विभागीय आयुक्त, (विकास शाखा) यांना व कार्यासन पापु-१० /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई / नागपूर व पापु-१० कार्यासनास सादर करावे.

४. राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कव्हरेज व गुणवत्ताबाधीत देखभाल व दुरूस्ती याखाली हाती घेतलेल्या योजनांसाठीचा खर्च हा ५०% केंद्र निधीतून व ५०% राज्य निधीतून करणे आवश्यक आहे

५. केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता ,IMIS या प्रणालीवर पुढील प्रमाणे नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्ययावत करण्यात याव्यात .

क. भौतिक दृष्ट्या १००% पूर्ण परंतु आर्थिक दृष्ट्या अपूर्ण योजना.

ख. >७५ ते <१००% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

ग. >५० ते <७५% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

घ. >२५ ते <५०% भौतिक दृष्ट्या पूर्ण.

६. सर्वसाधारण घटकांतर्गत उपलब्ध करून दिलेली सन २०१२-१३,२०१३-१४,२०१४-१५ आणि २०१६-१७ या वर्षांच्या सर्वसाधारण घटकाच्या कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा. उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास वेळीच सादर करावीत .

७. सदर रक्कम त्वरित आहरीत करण्यात यावी.

या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. २५.१८७२६११ कोटी (रुपये पंचवीस कोटी अठरा लक्ष बाहत्तर हजार सहाशे अकरा मात्र) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक, (वित्त)( श्री. सुधाकर डांगे) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. रूचेश जयवंशी) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक, (वित्त)( श्री. सुधाकर डांगे) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच व उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. रूचेश जयवंशी) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदरहू रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय- ०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि. २०/०४/२०१६ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि.

२०/०४/२०१६ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील क्र. ३ व ९ येथील बाबींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक क्र. २०१७०३१७१८३०२२५२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.21 14:17:24 +05'30'

**( सुनिल ज.तुमराम )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

महालेखापाल, महाराष्ट्र- १ मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
महालेखापाल, महाराष्ट्र २- नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
प्र.स .(पा.पु.व स्व.वि.) यांचे स्वीय सहाय्यक ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
उपसचिव, (अर्थसंकल्प) / उपसचिव (पापु-१०), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ,मुंबई.
संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी / कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग
संबधित जिल्ह्यांचे जिल्हा कोषागार अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन ,बेलापूर ,नवी मुंबई.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पा.पु.०४, पा.पु.२०.
निवडनस्ती पापु-१० कार्यासन

## विवरणपत्र

| | | |
|---|---|---|
| शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.राग्रापे-२०१६/प्र.क्र.६१ /पापु १०, दिनांक : २० मार्च २०१७ चे सहपत्र | | |
| ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांसाठी निधी वितरण (राज्य हिस्सा) **(सर्वसाधारण घटक) (लेखाशिर्ष २२१५ २०७१)** | | |
| | | (रुपये लाखात) |
| अ.क्र. | अंमलबजावणी यंत्रणेचे नांव | एकूण वितरीत रक्कम |
| १ | २ | ३ |
| १ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई | २५१८.७२६११ |
| | रुपये पंचवीस कोटी अठरा लक्ष बाहत्तर हजार सहाशे अकरा मात्र | |

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: CN = Sunil Jairam Tumram, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2017.03.21 14:17:57 +05'30'

**( सुनिल तुमराम )**

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन